**दिल्ली -मुंबई- इंडस्ट्रीयल -कॉरीडॉर (डी.एम.आय.सी.) प्रकल्पांतर्गत दिघी औद्योगिक क्षेत्रामधील अधिसूचीत झालेले क्षेत्र दिल्ली-मुंबई-इंडस्ट्रीयल-कॉरीडॉर ऐवजी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत विकसित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी-२०१९/प्र.क्र.५२८/उद्योग १४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ जुलै, २०२०

**प्रस्तावना -:**

केंद्र शासनाच्या वाणिज्य व उद्योग मंत्रालयामार्फत जपान शासनाच्या सहकार्याने दिल्ली व मुंबई या दोन शहरांना जोडणारा दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर हा महत्वकांक्षी प्रकल्प राबविण्यात येत आहे. या फ्रेट कॉरीडॉरची लांबी १४८२ कि. मी. असून सदर प्रकल्पात महाराष्ट्रासह उत्तर प्रदेश , दिल्ली, हरीयाणा, राजस्थान, गुजरात व मध्य प्रदेश या सहा राज्यांचा समावेश आहे. सदर औद्योगिक पट्ट्याची सुरुवात दिल्ली जवळील दादरी येथून होत असून, प्रकल्पाची सांगता महाराष्ट्रातील जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (जे.एन.पी.टी) येथे होणार आहे. सदर प्रक्रल्पास केंद्रीय मंत्रीमंडळाची दिनांक १५/९/२०११ रोजी बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर प्रकल्पाच्या उभारणीसाठी केंद्रीय वाणिज्य व उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांच्यामार्फत दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन (DMICDC) ची स्थापना करण्यात आली आहे. तर राज्य शासनामार्फत महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. हा महत्वकांक्षी प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या राज्यस्तरीय समन्वयासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास नोडल एजन्सी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. सदर प्रकल्पाच्या कार्यवाहीसाठी DMICDC मार्फत DMIC Trust ची स्थापना करण्यात आली आहे.

२. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी DMIC Trust व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्या संयुक्त भागीदारीतून (Joint Venture) दिघी, शेंद्रा व इतर ठिकाणी औद्योगिक नगरे विकसित करण्यात येणार असून त्यासाठी प्रत्येक नोडसाठी औद्योगिक नगरीसाठी विशेष हेतू कंपनी (SPV) स्थापन करण्यात आली आहे. या विशेष हेतू कंपनीमधील राज्य व केंद्र शासनासाठी गुंतवणूक यासंदर्भात DMIC Trust व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यामध्ये शेअर होल्डींग अग्रिमेंट (SHA) करण्यास तसेच सदर विशेष हेतू संस्थेला (SPV) ला राज्य शासनामार्फत उपलब्ध करून दयावयाच्या सुविधा, सवलती व सहाय्य यासंदर्भात राज्य शासन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व डी.एम.आय.सी. ट्रस्ट यांच्यामध्ये स्टेट सपोर्ट ॲग्रिमेंट (SSA) च्या मसुदयास

दि. २९/१/२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर प्रकल्पामध्ये महाराष्ट्रातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, नाशिक, पुणे, अहमदनगर, धुळे , नंदुरबार व औरंगाबाद या १० जिल्हयांचा समावेश आहे. सदर प्रकल्पामध्ये अतिरिक्त शेंद्रा (औरंगाबाद) तसेच दिघी बंदर या औद्योगिक क्षेत्रांतर्गत कार्ला येथील मल्टी मॉडेल लॉजिस्टीक पार्क, औरंगाबाद येथील औद्योगिक क्षेत्रांतर्गत प्रदर्शन व कन्हेंशन सेंटर व पुणे -नाशिक व पुणे -औरंगाबाद महामार्गाच्या संदर्भात ट्रान्सपोर्ट ॲण्ड टेलिकम्युनिकेशन कॉरीडॉर या प्रकल्पांना मान्यता देण्यात आलेली आहे.

या पार्श्वभूमीवर राज्य मंत्रीमंडळाच्या मान्यतेनुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर प्रकल्पांतर्गत दिघी औद्योगिक क्षेत्रासाठी अधिसूचीत करण्यात आलेले १२१४०.८४२ हे. आर क्षेत्रापैकी ५०% क्षेत्र सर्व कायदेशीर बाबी तपासून आवश्यकतेनुसार केंद्र शासन व संबंधीत विभागास अवगत करून अथवा सहमतीने व उद्योग विभागाची परवानगी घेण्याच्या अटीस अधीन राहून दिल्ली मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर (डीएमआयसी ) ऐवजी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत विकसीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००७०११४५०४१०३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

Kiran Ashok Jadhav

Digitally signed by Kiran Ashok Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a069b163d49daa17d116cff9328cf79c186f2c5007a7335fa7d1dae024c52fcb, cn=Kiran Ashok Jadhav
Date: 2020.07.01 14:58:55 +05'30'

**( किरण जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-:**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१६. महाव्यवस्थापक (डीएमआयसी), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१७. निवड नस्ती (उद्योग-१४),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.